कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.
कै.जुनेद ए हुसेन सय्यद, अधिक्षक

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०२२/प्र.क्र.०२/सेवा-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ०२ जून ,२०२३

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०.

२) सहसंचालक आरोगय सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/आरस्था/टे-३/कक्ष५ /श्री.सय्यद/२३६३-६५/२१, दि.२७.१२.२०२१

शासन निर्णय:-

संदर्भांकित क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ मे, २०२० अन्वये कोविड-१९ संबंधित कर्तव्य बजावतांना कोविड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना विमा कवच/ सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

२. सहसंचालक आरोगय सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांनी कै.जुनेद ए हुसेन सय्यद, अधिक्षक यांच्या कुटुंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० अनुसार रु. ५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. पोलीस रुग्णालय नागपाडा, मुंबई येथे प्रतिनियुक्तीवर कार्यरत असलेले कै.जुनेद ए हुसेन सय्यद, अधिक्षक यांचा कोविड-१९ संबंधित कर्तव्य पार पाडताना कोरोना विषाणू संसर्गाने दि.१४.०४.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे. त्यांच्या सेवा कोविड-१९ विषाणूच्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने मदतकार्य यामध्ये समाविष्ट होत आहेत. कै. जुनेद हे रुग्णालयात दाखल होण्यापूर्वी १४ दिवस कर्तव्यावर हजर होते. कै.सय्यद यांचा मृत्यू कोविड-१९ मुळे झाला असल्याचे पोलीस शल्यचिकित्सक, पोलीस रुग्णालय,नागपाडा, मुंबई यांनी प्रमाणित केले आहे.

४. त्यानुसार, पोलीस रुग्णालय नागपाडा, मुंबई येथे प्रतिनियुक्तीवरील कै.जुनेद ए हुसेन सय्यद, अधिक्षक यांच्या कुटुंबियांना रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेचे सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास या आदेशाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

५. वित्त विभाग शासन निर्णय, क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० मधील तरतूदीनुसार कै.जुनेद ए हुसेन सय्यद, अधिक्षक या कर्मचाऱ्यांच्या वारसास या संदर्भातील तरतूदी व नियम विचारात घेऊन सानुग्रह सहाय्य अदा करण्याची जबाबदारी सहसंचालक आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांची राहील.

६. प्रस्तुत खर्च खाली नमूद लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यईल.

२२१०-वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्य

०१-नागरी आरोग्य सेवा,विषम चिकित्सा

०१- संचालन व प्रशासन

००१-(एक) आरोग्य सेवा, संचालनालय,मुंबई (२२१०००९३)

०१-वेतन

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून,त्याचा संकेतांक २०२३०५१११५४७५९१३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B4E19876AB3EEC36E3A3B988441648AB87470CDFE66B14CFBE7AC9BD770485C1, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2023.06.02 18:01:55 +05'30'

(अर्चना वालझाडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई
२) सहसंचालक आरोगय सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
३) पोलीस सहआयुक्त (प्रशासन), पोलीस आयुक्त यांचे कार्यालय,बृहन्मुंबई
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
५) पोलीस शल्यचिकित्सक, पोलीस रुग्णालय,नागपाडा, मुंबई
६) निवडनस्ती (सेवा-५)